महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना आदिवासी उप योजनेंतर्गत सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षात मंजूर केलेले (कार्यक्रमांतर्गत) अनुदान वितरीत करण्याबाबत. (२४०१ ८२९१)

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७१८/प्र. क्र. ९०/७-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक : मफुकृवि-२००९/३४१/प्र. क्र. १३८/७-अे, दि. १९ /६/२०१३,

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: अर्थसं २०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८,

३) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र जा.क्र.मफुकृवि/लेखा शाखा-२/४४४/२०१७, दिनांक ०६/०६/२०१८,

४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक : बीयुडी - २०१८/प्र.क्र.११/कार्यासन-६, दिनांक ११ जून, २०१८.

५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक : बीयुडी - २०१८/प्र.क्र.११/कार्यासन-६, दिनांक ११ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता " मागणी क्र. टी-५, २४०१- पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ ८२९१) " या लेखाशीर्षांतर्गत एकूण रु. १०००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत नंदुरबार येथे शैक्षणिक वर्ष सन २०१३-१४ या शैक्षणिक वर्षापासून कृषि महाविद्यालय सुरु करण्यांस संदर्भ क्रमांक - १ च्या शासन निर्णयानुसार मान्यता प्रदान करण्यांत आली आहे. त्यानुसार संदर्भ क्रमांक - ३ च्या पत्रान्वये महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांच्याकडून प्राप्त झालेल्या मागणीनुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यांत येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता " **मागणी क्र. टी-५, २४०१, पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ ८२९१)"** या लेखाशीर्षांतर्गत रुपये १०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी वार्षिक तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदी पैकी नंदुरबार येथील कृषि महाविद्यालयाकरिता रु. २७५०० हजार इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पित तरतूदीमधून महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी

अंतर्गत नंदुरबार येथील कृषि महाविद्यालयाकरीता आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक - ५ च्या दिनांक ११/०९/२०१८ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती, तसेच खाली नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून रु. १९२५० हजार इतके अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. हजारात)**

| अ. क्र. | उपलेखाशिर्ष / बाब/योजना | सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पीत तरतूद | सन २०१८-१९ करिता ७०% मर्यादेत वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| | **०१ पीक संवर्धन (२४०१ ८२९१) , ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)** | | |
| १. | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत नंदुरबार येथील कृषि महाविद्यालय. | २७५०० | १९२५० |
| | **एकूण** | २७५०० | १९२५० |

## अटी व शर्ती

१) वरील मंजूर अनुदानाचा प्रत्यक्ष खर्च, मंजूर पदसंख्या व वितरीत अनुदानाचा विनियोग कृषि विद्यापीठाने प्रत्येक महिन्याच्या अखेरीस शासनास सादर करावा. कृषि विद्यापीठाने उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनांतर्गत योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे. तथापि, सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध झालेले अनुदान मंजूर मासिक वितरण विवरणपत्रानुसार खर्च करणे अनिवार्य राहील.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची कृषि परिषदेने / विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अनुदान आणि महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत / योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

८) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने विद्यापीठास मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्त्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१०) कृषि विद्यापीठास त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विद्यापीठास मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि **प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.**

१२) सन २०१८-२०१९ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१३) नियमबाह्य योजना, पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१४) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

१५) उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर यांनी वरीलप्रमाणे " **मागणी क्र. टी-५, २४०१- पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१,सहायक अनुदाने**

**(वेतनेतर) (२४०१ ८२९१)** " या उपशीर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेले उपरोक्त अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१६) या प्रित्यर्थचा खर्च सन २०१८-२०१९ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| मंजूर अनुदान | लेखाशिर्ष |
|---|---|
| रुपये १,९२,५०,०००/- | मागणी क्र. टी-५,<br>२४०१- पीक संवर्धन,<br>पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,<br>७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना,<br>(०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम),<br>३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ ८२९१) |

हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२, १४३, १४४ व १६२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक - अंदाज - २०१८ / प्र.क्र.६९ / अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ च्या परिपत्राकातील सर्व अटी व शर्थीनुसार तसेच आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बीयुडी - २०१८/प्र.क्र.११/कार्यासन-६, दिनांक ११/०९/२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००८१७२९५७११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gite Pratap Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa90705dc27d17e7f5a948e535706ff2c3a1f6c3212fbe679cdac2da9677bb72, serialNumber=707437d6d784d92730d943579bec96a06c8b9d1b0f545fe42541583be9e598cd, cn=Gite Pratap Venkatrao
Date: 2018.10.08 17:37:37 +05'30'

( प्रताप गिते )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक,
३) सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
४) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक / विद्यापीठ अभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
५) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक,
६) जिल्हाधिकारी, नंदुरबार, जिल्हा-नंदुरबार,

७) आयुक्त (कृषि), (अेजी १० सेल) महाराष्ट्र राज्य, पुणे (खर्च ताळमेळ शाखा),
८) उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर,
९) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, जिल्हा अहमदनगर,
११) उपकोषागार अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१३) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१४) जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१७) उपसचिव, आदिवासी विकास विभाग (कार्यासन-२/कार्यासन-६/ कार्यासन-९), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
१८) वित्त विभाग (व्यय १ / अर्थसंकल्प - १३ / अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
१९) कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक - २अे / ६अे /, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२०) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.